**केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य व मका विकास कार्यक्रम (Integrated Scheme of Oilseed and Maize-ISOPOM) अंतर्गत सन २०१३ - १४ मधील अखर्चित निधी सन २०१४ - १५ मध्ये राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान (NMOOP) अंतर्गत खर्च करण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१४/प्र.क्र.३१/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३० मार्च, २०१५

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग क्र. एगम-१२१३/प्र.क्र.७०/४अे, दि.३१ मे, २०१३, दि.१९/०८/२०१३, १९ डिसेंबर,२०१३ व २१ मार्च, २०१४
२) शासन निर्णय क्रमांक रागते-१२१४/प्र.क्र.३१/४अे, दि.१३ ऑगस्ट, २०१४, व दि. २८ जानेवारी, २०१५
३) केंद्र शासनाचे पत्र क्र. १४-२/२०१४-सीए-II, दि. ०५ मार्च, २०१५
४) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र. कृ.आ./विप्र-२/ NMOOP १४-१५/ वि.मा.पु.नि/प्र.क्र. १६/१०२/१५, दि.१३/०३/२०१५

प्रस्तावना

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय गळीत धान्य उत्पादन कार्यक्रम, राष्ट्रीय कडधान्य विकास कार्यक्रम व गतीमान मका विकास कार्यक्रम राज्यात सन १९९५-९६ पासून राबविण्यात येत होता. या योजनेच्या निधीत केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ७५:२५ असे होते. सदर कार्यक्रम सन २०१३-१४ मध्ये राज्यात राबविण्यासाठी दि. ३१ मे, २०१३ च्या शासन निर्णयान्वये रू. ४७११.८२ लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती व १९ ऑगस्ट, २०१३, २१ मार्च, २०१४ च्या शासन निर्णयान्वये रू. ३१३२.२२ लाख निधी वितरित केला होता. तसेच दि. १९ डिसेंबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये सन २०१२-१३ मधील अखर्चित रू. २४७.१९ लाख निधी, सन २०१३-१४ मध्ये खर्च करण्यास वित्तीय मान्यता दिली होती. अशाप्रकारे सन २०१३-१४ मध्ये सदर योजनेअंतर्गत केंद्र हिश्श्यापोटी एकूण रू. ३३७९.४१ लाख निधी उपलब्ध होता. सदर उपलब्ध निधीपैकी रू. ३२९६.७२ लाख निधी खर्च झाला असून, रू. ८२.६९ लाख निधी अखर्चित होता.

केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना केली आहे. त्यानुसार केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, कडधान्य, तेलताड व मका विकास कार्यक्रमाऐवजी राष्ट्रीय तेलबिया व तेलताड ( National Mission on Oilseed and Oil Palm) या

अभियानाची सुरवात केली आहे. सदर अभियानाअंतर्गत उपअभियान- १ ( तेलबिया ), उपअभियान-२ (तेलताड) व उपअभियान-३ ( वृक्षआधारित तेलबिया) या तीन उपअभियानांचा समावेश असणार आहे. या अभियानाच्या निधीत केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ७५:२५ असे आहे.

केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधीन अ.क्र. ३, दिनांक ०५ मार्च, २०१५ च्या पत्रान्वये सन २०१३-१४ मध्ये केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य व मका विकास कार्यक्रम **(Integrated Scheme of Oilseed, Oilpalm and Maize - ISOPOM )** अंतर्गत उपलब्ध करून दिलेल्या एकूण रू. ३३७९.४१ लाख निधीपैकी अखर्चित असलेला रू. ८२.६९ लाख निधी पुनर्जिवित केला असल्याचे व सदर निधी सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय तेलबिया व तेलजाड अभियान (NMOOP) खर्च करण्यास मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने दिलेली मान्यता विचारात घेऊन रू. ८२.६९ लाख (अक्षरी रूपये ब्याऐंशी लाख एकोणसत्तर हजार फक्त) निधी सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय तेलबिया व तेलजाड अभियान (NMOOP) अंतर्गत खर्च करण्यासाठीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

केंद्र शासनाने दि. ०५ मार्च, २०१५ च्या पत्रान्वये केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य व मका विकास कार्यक्रम अंतर्गत सन २०१३-१४ मध्ये अखर्चित असलेला रू.८२.६९ लाख निधी पुनर्जिवित करून, सदर निधी राष्ट्रीय तेलबिया व तेलजाड अभियान (NMOOP) खर्च करण्यास मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने दिलेली मान्यता विचारात घेऊन, पुनर्जिवित केलेला रू. ८२.६९ लाख (अक्षरी रूपये ब्याऐंशी लाख एकोणसत्तर हजार फक्त) निधी सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय तेलबिया व तेलजाड अभियान (NMOOP) अंतर्गत खर्च करण्यासाठीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२ या योजनेसाठी पुनर्जिवित केलेला रू. ८२.६९ लाख निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१४- १५ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी-३,**
**२४०१,पीक संवर्धन, ११४, तेलबियां**
**(००) (०६) राष्ट्रीय अभियान तेलबिया व तेलताड**
**लघु अभियान-१ (तेलबिया) ( केंद्र हिस्सा ७५ टक्के)**
**(२४०१ २४९८) ३३- अर्थसहाय्य, (योजनांतर्गत) (दत्तमत)**

३. केंद्र शासनाने पुनर्जिवित केलेला रू. ८२.६९ लाख निधी अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व सर्वसाधारण घटकासाठी अनुक्रमे रू. ९.७३ लाख, रू. २.२१ लाख व रू. ७०.७५ लाख असा

संवर्गनिहाय खर्च करावा. अनुसूचित जाती/ अनुसूचित जमाती संवर्गासाठी वितरित केलेला निधी त्याच घटकासाठीच खर्च करण्यात यावा व कोणत्याही परिस्थितीत सदर निधी सर्वसाधारण घटकाकडे वळविण्यात येऊ नये. तसे केल्याचे आढळल्यास, संबंधितांवर कठोर कारवाई करण्यात यावी

४. राज्य हिश्श्याच्या जिल्हा नियोजन समितीच्या अख्यत्यारितील तरतूदीस प्रशासकीय तसेच वित्तिय मान्यता संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून देण्यात येईल.

५. सदर योजनेअंतर्गत या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत असलेला ₹ ८२.६९ लाख निधीचा कार्यक्रम सन २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व या निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदर प्रयोजनार्थ विभागीय कृषी सहसंचालक स्तरावर, विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हा स्तरावर जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी व तालुका स्तरावर, तालुका कृषी अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

६. **सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र ८०/२०१५ /व्यय- १, दि.२७/३/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व मा. अपर मुख्य सचिव ( कृषि ) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.**

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१३२४०७५२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Hoktuji Chawre

Digitally signed by Siddharth Hoktuji Chawre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agricultural and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharth Hoktuji Chawre
Date: 2015.03.30 13:34:29 +05'30'

**( सिध्दार्थ चवरे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
३. सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१

४. विभागीय आयुक्त (सर्व)
५. जिल्हाधिकारी, (सर्व)
६. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
८. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०. कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२. मुख्या लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१३. व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१५. सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१७. महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१८. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
१९. वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
२०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
२१. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
२२. सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन प्रभाग)
२३. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२४. मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
२५. निवडनस्ती